सार्वजनिक बांधकाम विभागाच्या स्विकृत निविदा आणि भविष्यात स्विकृत होणाऱ्या निविदांमध्ये रोकड विरहीत व्यवहार होण्याच्या दृष्टीने अटी व शर्तीत सुधारणा करणे.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. निविदा-२०१६/प्र.क्र.२०/शिकाना/इमा-२**
मंत्रालय, नागपूर.
दिनांक :- ०९ /१२/२०१६

<u>वाचा</u> :-१) महाराष्ट्र शासन, सा.बां. विभाग नियमावली १९८४
२) शासन परिपत्रक क्रमांक : सीओएम - २०१५/प्र.क्र.१०/२०१५ संगणक कक्ष, दिनांक १८ एप्रिल २०१५.
३) शासन परिपत्रक क्रमांक-संकिर्ण २०१६/प्र.क्र.२०/इमारती-२, दिनांक २८ एप्रिल २०१६.

**<u>प्रस्तावना</u> :-**

सार्वजनिक बांधकाम विभाग हा राज्यात विविध रस्ते, पूल आणि शासकीय इमारतींची बांधकामे हाती घेऊन पूर्ण करतो. ही कामे करण्याऱ्या कंत्राटदाराची देयकांची अदायगी Digital India मिशनचा भाग म्हणून सार्वजनिक बांधकाम विभागाने E-bill प्रणाली संदर्भ क्र. ३ च्या परिपत्रकानुसार लागू केली आहे. सर्व कंत्राटदारांचे देयकांची अदायगी RTGS व NEFT पध्दतीने करण्यात यावे, असे आदेश संदर्भ क्र. ३ च्या शासन परिपत्रकानुसार निर्गमीत केलेले आहेत.

केंद्र शासनाने Digital India मिशनप्रमाणेच आता रोकड विरहीत यंत्रणा (Cashless Transaction) निर्माण करण्याचे धोरण जाहीर केले आहे. या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत होणा-या निरनिराळ्या कंत्राटाबाबतचे व्यवहार रोकड विरहीत होण्यासाठी काही सुधारणा करण्याचे विभागाच्या विचाराधीन होते. याबाबत सर्वंकष व सखोल अभ्यास करून सार्वजनिक बांधकाम विभाग खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**निर्णय :-**

१. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रगतीत असलेल्या निरनिराळ्या कंत्राटांमध्ये कंत्राटदारांनी त्यांचे आस्थापनेवर नियुक्त मजूर व अन्य कर्मचाऱ्यांचे वेतन अदायगी आधार कार्ड संलग्न करुनच अदा करावी. संबंधीत कर्मचाऱ्यांचे/मजूरांचे आधारकार्ड (Unique Identification Number) प्राप्त करून घेणे बंधनकारक करावे. ज्या ठिकाणी आधारकार्ड उपलब्ध होण्यास अडचणी निर्माण होत असतील त्या ठिकाणी सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांचे तात्काळ सहकार्य घ्यावे. या सर्व बाबी ३१ डिसेंबर २०१६ पर्यंत पूर्ण कराव्यात.

२. भविष्यात यापुढे सार्वजनिक बांधकाम विभागाचे सक्षम प्राधिकारी, प्रारुप निविदा मसूदा मंजूर करतांना विहीत मसुद्यामध्ये खालील प्रमाणे अटी व शर्ती समाविष्ट करतील.

Contractor shall submit a certificate to the effect that **"All the payments to the labour/staff are made in bank accounts of staff linked to Unique Identification Number (AADHAR CARD)."** The certificate shall be submitted by the contractor within 60 days from the commencement of contract. If the time period of contract is less than 60 days then such certificates shall be submitted within 15 days from the date of commencement of contract.

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या निविदा मंजूर करणारे सर्व सक्षम प्राधिकारी यांनी निविदा मंजूर करतांना प्रस्तूतची अट निविदेत समाविष्ट असल्याची खात्री करुनच निविदा मंजूरीबाबत कार्यवाही करावी.

शासनाचे हे आदेश हा शासन निर्णय निर्गमीत केल्याच्या दिनांकापासून लागू होतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१६१२०९१६२४४६५२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

P Y Kadam

Digitally signed by P Y Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Work Department, postalCode=400002, st=Maharashtra, 2.5.4.20=d75bd17d0cade9a9e1fd7c1b33b6626ce09e4a1ea0dbed93a3e484e88f49db32, cn=P Y Kadam
Date: 2016.12.09 16:26:44 +05'30'

**(पी.वाय.कदम)**
कार्यासन अधिकारी,
सार्वजनिक बांधकाम विभाग

**प्रत,**

१. मा.मंत्री (सा.बां.) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (सा.बां.) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (सा.बां.) यांचे स्विय सहायक, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई
४. सचिव (रस्ते) यांचे स्विय सहायक, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई
५. सचिव (बांधकामे) यांचे स्विय सहायक, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई.
६. मुख्य अभियंता,सा.बां.प्रा.विभाग, मुंबई/पुणे/नाशिक/नागपूर/अमरावती/औरंगाबाद.
७. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प (सा.बां.) विभाग, मुंबई
८. मुख्य अभियंता (विद्युत), सा.बां.प्रा.विभाग, बांधकाम भवन,मर्झबान रोड,फोर्ट,मुंबई.
९. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.प्रा.विभाग, बांधकाम भवन,मर्झबान रोड,फोर्ट,मुंबई.
१०.सर्व अधीक्षक अभियंता व सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.